**राष्ट्रीय कृषि विकास योजना-कॅफेटेरिया अंतर्गत प्रति थेंब अधिक पीक योजनेस सर्वसाधारण प्रवर्गाकरिता रु.६५.०० लक्ष निधी वितरीत करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**

**कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय व मत्स्यव्यवसाय विभाग**

**शासन निर्णय क्र. राकृवि-०५२४/प्र.क्र.१२४ (भाग-१)/१४-अे**

मादाम कामा मार्ग,हुतात्मा राजगुरु चौक,

मंत्रालय, मुंबई-३२.

दिनांक : ०६ ऑगस्ट, २०२४.

**संदर्भ :**
१. प्रधानमंत्री कृषि सिंचन योजना-प्रति थेंब अधिक पीक (सूक्ष्म सिंचन) घटकाच्या केंद्र शासनाने सन २०२३ करिता निर्गमित केलेल्या मार्गदर्शक सूचना.
२. कृषि व शेतकरी कल्याण विभाग,कृषि व शेतकरी कल्याण मंत्रालय, भारत सरकार यांचे पत्र क्र. No.5-1/2022-RKVY,दि.०६ एप्रिल,२०२२.
३. कृषि व शेतकरी कल्याण मंत्रालय, भारत सरकार यांचे पत्र क्र. No.7-1/202४-RKVY, दि.१४ मे, २०२३.
४. केंद्र शासनाचे पत्र क्र. F.No.७-१/२०२३-RKVY/१, दि. ०१ ऑगस्ट, २०२३.
५. राष्ट्रीय कृषि विकास योजना-कॅफेटेरिया राज्यस्तरीय मंजुरी समितीच्या (SLSC) दि.०३ मे,२०२४ रोजीच्या बैठकीचे इतिवृत्त.
६. कृषि व पदुम विभागाचा शासन निर्णय क्र. राकृवि-०५२४/प्र.क्र.१२४/१४-अे, दि. १६ मे,२०२४
७. कृषि व शेतकरी कल्याण मंत्रालय, भारत सरकार यांचे पत्र क्र. No.1-15/2024-RKVY/1, दि. ०३ जुन, २०२४.
८. कृषि व पदुम विभागाचा शासन निर्णय क्र. राकृवि-०५२४/प्र.क्र.१२४/१४-अे, दि. १९ जून, २०२४.
९. कृषि व पदुम विभागाचा शासन निर्णय क्र. राकृवि-०५२४/प्र.क्र.१२४/१४-अे, दि. १२ जुलै, २०२४.

**प्रस्तावना :**

सन २०१५-१६ पासून प्रधानमंत्री कृषी सिंचन योजनेंतर्गत प्रति थेंब अधिक पीक (सूक्ष्म सिंचन) घटकाची अंमलबजावणी राज्यात करण्यात येत आहे.

२. केंद्र शासनाच्या दि.०६ एप्रिल,२०२२ रोजीच्या पत्रान्वये राष्ट्रीय कृषि विकास योजना-रफ्तार ची राष्ट्रीय कृषि विकास योजना-कॅफेटेरिया या नावाने पुनर्ररचना केली असून त्यामध्ये वार्षिक कृती आराखडा आधारित व सविस्तर प्रकल्प अहवाल आधारित या दोन शाखांचा समावेश आहे. प्रधानमंत्री कृषि सिंचन योजनेतील प्रति थेंब अधिक पीक (सूक्ष्म सिंचन) हा घटक राष्ट्रीय

कृषि विकास योजना-कॅफेटेरियाच्या वार्षिक कृती आराखडा आधारित शाखेत अंतर्भूत केली असून केंद्र व राज्य हिश्श्याच्या निधीचे प्रमाण ६०:४० असे आहे.

३. राष्ट्रीय कृषि विकास योजना-कॅफेटेरिया योजनेंतर्गत मुख्य सचिवांच्या अध्यक्षतेखालील राज्य स्तरीय मंजुरी समितीने (वार्षिक कृती आराखडा आधारित) दि.०३ मे, २०२४ रोजी झालेल्या बैठकीत दिलेल्या मान्यतेनुसार संदर्भ क्र. ६ येथील दि. १६ मे, २०२४ च्या शासन निर्णयान्वये प्रति थेंब अधिक पिक (सूक्ष्म सिंचन) योजनेच्या रु.६६७.५० कोटीच्या कार्यक्रमास प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात आलेली आहे.

४. केंद्रीय कृषि मंत्रालयाने संदर्भ क्र. ४ अन्वये राज्य शासनास दिलेल्या अधिकारानुसार सन २०२४-२५ मध्ये सर्वसाधारण प्रवर्गाकरिता उपलब्ध केंद्र हिस्सा रु.३९.०० लक्ष व त्या समकक्ष राज्यहिस्सा रु.२६.०० लक्ष असा एकूण रु.६५.०० लक्ष इतका निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती, त्यानुषंगाने शासन पुढीलप्रमाणे निर्णय घेत आहे.

**शासन निर्णय :**

१. राष्ट्रीय कृषि विकास योजना-कॅफेटेरिया च्या प्रति थेंब अधिक पीक (सूक्ष्म सिंचन) घटकाअंतर्गत सर्वसाधारण प्रवर्गासाठी केंद्र हिश्श्याचा रु. ३९.०० लक्ष (रुपये एकोणचाळीस लक्ष फक्त) व त्या समरुप राज्य हिश्श्याचा रु. २६.०० लक्ष (रुपये सव्वीस लक्ष फक्त) असा एकूण रु.६५.०० लक्ष (रुपये पासष्ट लक्ष फक्त) निधी आयुक्त (कृषि) यांना अर्थसंकल्पीय वितरण प्रणालीवर वितरित करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

२. सदर खर्च पुढील लेखाशिर्षाखालील सन २०२४-२५ करिताच्या मंजूर अर्थसंकल्पीय तरतुदीतून भागविण्यात यावा.

| केंद्र हिस्सा | राज्य हिस्सा |
|---|---|
| मागणी क्र. डी-३<br>२४०१ पीक संवर्धन<br>११३, कृषि अभियांत्रिकी<br>(००)(०७) प्रधानमंत्री कृषि सिंचन योजना-प्रति थेंब अधिक पीक (सुक्ष्म सिंचन) (कें.पु.यो.) (केंद्र हिस्सा ६०%) (सर्वसाधारण) (कार्यक्रम)<br>(२४०१२५०४), ३३, अर्थसहाय्य | मागणी क्र. डी-३<br>२४०१ पीक संवर्धन<br>११३, कृषि अभियांत्रिकी<br>(००)(२१) प्रधानमंत्री कृषि सिंचन योजना-प्रति थेंब अधिक पीक (सुक्ष्म सिंचन) (कें.पु.यो.) (राज्य हिस्सा ४०%) (सर्वसाधारण) (कार्यक्रम)<br>(२४०१ए९९६), ३३, अर्थसहाय्य |

३. सदर निधीचे वितरण करण्याकरिता आयुक्त (कृषि) यांना नियंत्रण अधिकारी व सहाय्यक संचालक (लेखा-१), कृषि आयुक्तालय, पुणे यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

४. या शासन निर्णयान्वये वितरीत करण्यात आलेला निधी खर्च करताना राष्ट्रीय कृषि विकास योजना-कॅफेटेरिया अंतर्गत प्रति थेंब अधिक पीक योजनेच्या मार्गदर्शक सूचनांचे काटेकोरपणे पालन करावे.

५. सदर योजनेच्या लाभार्थ्यांची निवड महा-डीबीटी प्रणालीद्वारे करण्यात यावी व लाभार्थ्यांना अनुदानाचे वाटप आधार संलग्न बँक खात्यावर करण्याकरिता सार्वजनिक वित्त व्यवस्थापन प्रणालीचा वापर करावा.

६. सदर निधीच्या खर्चाचे उपयोगिता प्रमाणपत्र केंद्र शासनास पाठवून त्याची प्रत राज्य शासनास पाठवावी.

७. सदर शासन निर्णय वित्त विभागाने शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०२४/प्र.क्र.३४/अर्थ-३, दि.०१ एप्रिल,२०२४ नुसार विहित केलेल्या अटींची पूर्तता होत असल्याने तसेच, सदर परिपत्रकानुसार या विभागास प्रदान केलेल्या अधिकारांनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०२४०८०६१७१४०६१००१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

MAHENDRA SOPAN GHADGE

Digitally signed by MAHENDRA SOPAN GHADGE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=AGRICULTURE AND ADF DEPARTMENT, 2.5.4.20=9847eac29efa7aa62661b16d1619a1bfaf6d99b23ec6836d8d498d0797965898, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=761BD1B7183B95814545ACE2DBF80778C68C7EE4EF46BAA6EA9B8BD1F47C2642, cn=MAHENDRA SOPAN GHADGE
Date: 2024.08.06 17:29:12 +05'30'

**( महेंन्द्र सो. घाडगे )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. अपर मुख्य सचिव (नियोजन) यांचे स्वीय सहायक, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई,
२. अपर मुख्य सचिव (वित्त) यांचे स्वीय सहायक, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई,
३. अपर मुख्य सचिव (कृषि) यांचे स्वीय सहायक, कृषि विभाग, मंत्रालय, मुंबई,
४. आयुक्त (कृषि), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे,
५. संचालक (फलोत्पादन), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे,
६. विभागीय कृषि सहसंचालक (सर्व),
७. महासंचालक, माहिती व जनसंपर्क संचालनालय, मुंबई,
८. महालेखापाल महाराष्ट्र (लेखा व अनुज्ञेयता) मुंबई/नागपूर,
९. महालेखापाल महाराष्ट्र (लेखा परिक्षा) मुंबई/नागपूर,
१०. वित्त विभाग (व्यय- १/अर्थसंकल्प १३), मंत्रालय मुंबई,
११. नियोजन विभाग (का-१४३१), मंत्रालय, मुंबई,
१२. निवडनस्ती.